**<u>यशवंत पंचायत राज अभियान सन २०२२-२३</u>**
**राज्यातील अत्युत्कृष्ट जिल्हा परिषद व पंचायत समित्या यांना विभाग व राज्यस्तरावर पुरस्कार प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०२२/प्र.क्र.११२/पंरा-१**
बांधकाम भवन, तळमजला, २५ मर्झबान रोड, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१.
तारीख: - १२ जून, २०२३

**वाचा- शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०२२/प्र.क्र.११२/पंरा-१,दिनांक ०३ जानेवारी, २०२३**

**<u>शासन निर्णय</u>:-**

ग्रामीण महाराष्ट्राच्या विकासामध्ये पंचायत राज संस्थांचे योगदान मोठे आहे. राज्यामधील विकासाच्या प्रमुख योजना पंचायत राज संस्थांमार्फत राबविल्या जातात. पंचायत राज संस्थांना त्यांनी केलेल्या कामगिरीनुसार प्रोत्साहित करुन त्यांची कार्यक्षमता अधिक वाढविणे व त्यांच्यामध्ये उत्कृष्ट कामांची स्पर्धा निर्माण करणे आवश्यक आहे. यासाठी राज्यात पंचायत राज संस्थांचे व्यवस्थापन व विकास कार्यात अत्युत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतींसाठी सन २००५-२००६ या आर्थिक वर्षापासून विभागस्तर व राज्यस्तरावर “यशवंत पंचायत राज अभियान” ही पुरस्कार योजना सुरु करण्यात आलेली आहे.

या विभागामार्फत राज्यातील ग्रामपंचायतींसाठी “स्मार्ट ग्राम व्हिलेज” ही योजना नव्याने राबविण्यात येत असल्याने, “यशवंत पंचायत राज अभियान” या योजनेमध्ये ग्रामपंचायती समाविष्ट न करण्याचा निर्णय शासनाने सन २०१६-१७ आर्थिक वर्षापासून घेतला आहे. पंचायत राज प्रशासन व विकास कार्यात उत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांनी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये केलेल्या कामाचे मूल्यमापन विचारात घेऊन विभागस्तर व राज्यस्तर अशा दोन स्तरावर “यशवंत पंचायत राज अभियान” ही अभिनव पुरस्कार योजना यावर्षी देखील राबविण्यात आली. सदर अभियानांतर्गत राज्यातील अत्युत्कृष्ट तीन जिल्हा परिषदा व तीन पंचायत समित्या पुरस्कारासाठी राज्यस्तरावर निवड करण्यात येते. तसेच विभागस्तरावर तीन पंचायत समित्यांची पुरस्कारासाठी निवड करण्यात येते. सदर निवड करण्यासाठी तालुकास्तरावर, जिल्हास्तरावर,

विभागस्तरावर आणि राज्यस्तरावर पारितोषिक निवड समितीची स्थापना करण्यात आलेली होती. याबाबतच्या सूचना संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक ०३ जानेवारी, २०२३ अन्वये देण्यात आल्या होत्या.

विभागस्तरीय मूल्यांकन समितीने शिफारस केलेल्या प्रत्येक विभागातून प्रथम आलेल्या जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांची या विभागाच्या दिनांक ०३ जानेवारी, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरावरून क्षेत्रिय स्तरावर पडताळणी करणे आवश्यक होते. त्यासाठी राज्यस्तरीय पारितोषिक निवड समितीच्या वतीने विभागीय आयुक्त कार्यालयांची अदला बदल करून क्षेत्रिय पडताळणी करण्याबाबतच्या सुचना विभागीय आयुक्त कार्यालयांना देण्यात आल्या होत्या. सर्व विभागीय आयुक्त कार्यालयांकडून पंचायत राज सस्थांचे क्षेत्रिय पडताळणी अहवाल शासनास प्राप्त झाले आहेत.

राज्यस्तरावर अत्युत्कृष्ट पंचायत राज संस्थांची निवड करण्यासाठी राज्यस्तरीय मूल्यांकन समितीची दिनांक २२ मे, २०२३ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. राज्यस्तरीय पारितोषिक निवड समितीने, राज्यस्तरीय पडताळणी समितीकडून प्राप्त झालेल्या अहवालाची तपासणी करून प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाच्या पुरस्कारासाठी पुढील प्रमाणे अत्युत्कृष्ट तीन जिल्हा परिषदा व तीन पंचायत समित्यांची राज्यस्तरावर निवड केली आहे.

**<u>राज्यस्तर पुरस्कार :-</u>**

अ) जिल्हा परिषद

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हा परिषद, यवतमाळ | प्रथम पारितोषिक |
| २ | जिल्हा परिषद, कोल्हापूर | द्वितीय पारितोषिक |
| ३ | जिल्हा परिषद, लातूर | तृतीय पारितोषिक |

ब) पंचायत समिती

| | | |
|---|---|---|
| १ | पंचायत समिती लातूर , जि. लातूर | प्रथम पारितोषिक |
| २ | पंचायत समिती काटोल, जि. नागपूर | द्वितीय पारितोषिक |
| ३ | पंचायत समिती राहता, जि. अहमदनगर | तृतीय पारितोषिक |

तसेच प्रत्येक विभागस्तरीय समितीने पुरस्कारासाठी शिफारस केलेल्या पंचायत समित्यांमधून राज्यस्तरीय मुल्यांकन समितीने निवड केलेल्या प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाच्या अत्युत्कृष्ट पंचायत समित्यांची नावे खालील प्रमाणे आहेत.

विभागस्तरीय पुरस्कारप्राप्त पंचायत समिती :-

| | | | |
|---|---|---|---|
| १ | **कोकण** | पंचायत समिती संगमेश्वर, जिल्हा रत्नागिरी | प्रथम |
| | | पंचायत समिती मालवण, जिल्हा सिंधुदुर्ग | द्वितीय |
| | | पंचायत समिती शहापूर, जिल्हा ठाणे | तृतीय |
| २ | **नाशिक** | पंचायत समिती राहाता, जिल्हा अहमदनगर | प्रथम |
| | | पंचायत समिती पारोळा, जिल्हा जळगाव | द्वितीय |
| | | पंचायत समिती संगमनेर, जिल्हा अहमदनगर | तृतीय |
| ३ | **पुणे** | पंचायत समिती अक्कलकोट, जिल्हा सोलापूर | प्रथम |
| | | पंचायत समिती गडहिंग्लज, जिल्हा कोल्हापूर | द्वितीय |
| | | पंचायत समिती शिराळा, जिल्हा सांगली | तृतीय |
| ४ | **औरंगाबाद** | पंचायत समिती लातूर, जिल्हा लातूर | प्रथम |
| | | पंचायत समिती जळकोट, जिल्हा लातूर | द्वितीय |
| | | पंचायत समिती अर्धापूर,जिल्हा नांदेड | तृतीय |
| ५ | **अमरावती** | पंचायत समिती शेगाव, जिल्हा बुलढाणा | प्रथम |
| | | पंचायत समिती अचलपूर, जिल्हा अमरावती | द्वितीय |
| | | पंचायत समिती खामगाव, जिल्हा बुलढाणा | तृतीय |
| ६ | **नागपूर** | पंचायत समिती, काटोल, जिल्हा नागपूर | प्रथम |
| | | पंचायत समिती कामठी, जिल्हा नागपूर | द्वितीय |
| | | पंचायत समिती कुरखेडा, जिल्हा गडचिरोली | तृतीय (पुरस्कार विभागून) |
| | | पंचायत समिती चंद्रपूर, जिल्हा चंद्रपूर | |

अंतिम निवड केलेल्या पंचायत समित्या व जिल्हा परिषदांना विभागस्तरावर बक्षिस वितरण समारंभाचे आयोजन करून राज्य व विभाग या दोन्ही स्तरावरील पुरस्काराचे वितरण करण्याचे नियोजन विभागस्तरावर करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१२११४६४९०८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPALI UPENDRA JAPE

Digitally signed by DEEPALI UPENDRA JAPE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=735d6d81d9099a643dc5a1e7e261a6ea60ad4418817bd25d02db4654ea8c8e11, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EDA6DD54D9C1D002A33252AA96B6C559E22C914431F772457B39E98A5FCEAC, cn=DEEPALI UPENDRA JAPE
Date: 2023.06.12 12:27:18 +05'30'

(दीपाली जपे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

१) मा.राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
४) मा. विधानसभा/ मा. विधान परिषद सदस्य (सर्व)
५) मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
६) मा.अतिरिक्त मुख्य सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).
७) विभागीय आयुक्त (सर्व).
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
९) उप सचिव/ सह सचिव (सर्व),ग्राम विकास विभाग,मुंबई.
१०) निवड नस्ती, कार्यासन क्र.पंरा-१, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.